लातूर शहर महानगरपालिकेतील
अत्यावश्यक संवर्गातील रिक्त पदे भरणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- लामपा-२०२१/प्र.क्र.४१८/नवि-२४**
मंत्रालय, ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० एप्रिल, २०२२.

संदर्भ :- १) लातूर शहर महानगरपालिका सर्वसाधारण सभेचा विषय क्र.९, दि १२.२.२०२१
२) आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.लामनपाला/सामान्य प्रशासन विभाग/७४८१/२०२१,दिनांक ७.१२.२०२१
३) आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.लामनपाला/सामान्य प्रशासन विभाग/८४३१/२०२१,दिनांक २०.१२.२०२१

प्रस्तावना :-

लातूर शहर महानगरपालिकेच्या आकृतीबंधास दिनांक २८.५.२०१३ अन्वये मंजूर देण्यात आली. सदर आकृतीबंध मंजूरीच्या अटी व शर्तीमध्ये अ.क्र.६ मध्ये नविन आकृतीबंधामुळे जी पदे भरण्याकरीता उपलब्ध होतील अशी पदे आस्थापना खर्च विहित मर्यादेत असल्यास भरता येतील या अटीचे समावेशन आहे. महानगरपालिकेमध्ये अत्यावश्यक सेवा पुरविणे आवश्यक असल्याने विविध पदनामाचे एकूण ८१ पदे सरळसेवेने व ३ पदे प्रतिनियुक्तीने भरण्यास, सध्या ५९.८३ टक्के असलेली आस्थापना खर्चाची अट शिथील करण्याबाबत आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन दिनांक ७.१२.२०२१ व दिनांक २०.१२.२०२१ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला.

०२. लातूर शहर महानगरपालिकेमध्ये अत्यावश्यक सेवा पुरविणे आवश्यक असल्याने विविध पदनामाचे एकूण ८१ पदे सरळसेवेने व ३ पदे प्रतिनियुक्तीने भरण्यास आस्थापना खर्चाची अट शिथील करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

लातूर महानगरपालिकेमधील पाणीपुरवठा विभाग, आरोग्य विभाग तसेच अग्निशमन विभागातील कामकाज व्यवस्थित व सुरळीत करण्याच्या दृष्टीने अत्यावश्यक सेवेतील एकूण ५१ रिक्त पदे भरणे आवश्यक आहे. तसेच, कर वसुली करुन महानगरपालिकेचे उत्पन्न वाढविणेसाठी कर विभागातील लिपीक टंकलेखक पदे वगळून, कर अधिक्षक, सहाय्यक कर अधिक्षक व कर निरीक्षक या संवर्गातील १० रिक्त पदे भरणे आवश्यक आहे. तथापि, लातूर महानगरपालिकेचे आस्थापना खर्चाची

मर्यादा शिथील करुन आयुक्तांच्या प्रस्तावातील खालील विवरणपत्र “अ” मध्ये नमूद केलेली अत्यावश्यक सेवेतील ६१ पदे भरण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**विवरणपत्र “अ”**

| अ.क्र. | पदनाम | पद संख्या |
|---|---|---|
| | **जल अभियंता यांचे पथक** | |
| १ | कार्यकारी अभियंता | १ |
| २ | कनिष्ठ अभियंता (पा.पु.) | ४ |
| ३ | वॉलमन | ४ |
| | **वैद्यकीय अधिकारी यांचे पथक** | |
| १ | वैद्यकीय अधिक्षक (मनपा दवाखाना) | १ |
| २ | औषध निर्माता | १ |
| | **अग्निशमन विभाग** | |
| १ | अग्निशमन केंद्र अधिकारी | १ |
| २ | चालक यंत्रचालक | ९ |
| ३ | फायरमन | ३० |
| | **मुल्य निर्धारक,कर संकलन अधिकारी यांचे पथक** | |
| १ | कर अधिक्षक | २ |
| २ | सहाय्यक कर अधिक्षक | ४ |
| ३ | कर निरीक्षक | ४ |
| | **एकूण** | ६१ |

**०२.** उपरोक्त पदांच्या बाबतीत, दिनांक १९.९.२०१९ अन्वये मान्यता दिलेल्या लातूर शहर महानगरपालिकेचे सेवाप्रवेश नियम, २०१९ मधील तरतूदींचे पालन करावे.

**०३.** लातूर महानगरपालिकेचा सध्याचा आस्थापना खर्च हा ३५ टक्के या विहीत मर्यादेपेक्षाही जास्त आहे. तरी, लातूर शहर महानगरपालिकेने त्यांचा आस्थापना खर्च विहीत मर्यादेत आणण्या संदर्भात आवश्यक त्या उपाययोजना तात्काळ कराव्यात.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०४२११४५७१३६२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.04.21 15:00:11 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महापौर, लातूर शहर महानगरपालिका.

२. आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका.

३. मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव.

४. अपर मुख्य सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.

५. निवड नस्ती (नवि-२४).